राज्य सरोवर संवर्धन योजनेंतर्गत मौजे गडमुडशिंगी, ता. करवीर, जि. कोल्हापूर येथील यशवंत गंगासागर तलावास प्रशासकीय मान्यतेसह अंतिम मान्यता प्रदान करणेबाबत .

**महाराष्ट्र शासन**
**पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग**
शासन निर्णय क्रमांकः रासयो-२०२४/प्र.क्र.३/आस्थापना-अ
नवीन प्रशासन भवन, १५ वा मजला, हुतात्मा राजगुरू चौक,
मादाम कामा मार्ग, मुंबई-४०० ०३२
दिनांक : २६ ऑगस्ट, २०२४

**वाचा :-**

१) पर्यावरण विभाग विभाग शासन निर्णय क्र.इएनव्ही २००८/प्र.क्र.६९/तां.क.३, दि.२७.०८.२००८

२) पर्यावरण व वातावरणीय बदल विभागाचा समक्रमांकाचा शासन निर्णय, दि.११.०१.२०२४

३) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद कोल्हापूर, जि .कोल्हापूर यांच्याकडून दि. २३.१०.२०२३ रोजीच्या पत्रासोबत प्राप्त प्रस्ताव.

४)सुकाणू समितीच्या दिनांक ०६.०२.२०२४ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.

**प्रस्तावना -**

राज्यातील तलाव, सरोवरे व मोठे जलाशय यांचे पर्यावरणीयदृष्टया संवर्धन करण्यासाठी राज्य शासनाने राज्य योजनेंतर्गत राज्य सरोवर संवर्धन योजना सन २००६-०७ या आर्थिक वर्षापासून सुरु केली आहे. सदर योजनेंतर्गत सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद कोल्हापूर, जि. कोल्हापूर यांच्यामार्फत सादर यशवंत गंगासागर तलाव संवर्धन प्रस्तावास वाचा क्र.२ मध्ये नमूद दि.११.०१.२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये रु.४२८.०० लक्षच्या मर्यादेत तत्त्वत: मान्यता देण्यात आली होती तसेच रु.१,००,००,०००/- (रुपये एक कोटी फक्त( इतका निधी मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद कोल्हापूर, जि. कोल्हापूर यांना वितरित करण्यात आला होता.

दरम्यानच्या काळात मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद कोल्हापूर, जि. कोल्हापूर यांनी विभागास सादर केलेला यशवंत गंगासागर तलाव संवर्धनाचा रुपये ४,२८,००,८८७/- इतक्या किंमतीचा सुधारित प्रस्ताव सादर केला असून सदर प्रस्ताव दि.०६ फेब्रुवारी, २०२४ रोजी झालेल्या सुकाणू समितीसमोर ठेवण्यात आला होता. सदर तलाव संवर्धनाच्या रुपये ४,२८,००,०००/- इतक्या किमतीच्या प्रस्तावास सुकाणू समितीने प्रशासकीय मान्यतेसह अंतिम मान्यता देण्याची शिफारस केली आहे. त्यानुषंगाने आता यशवंत गंगासागर तलाव संवर्धनाच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यतेसह अंतिम मान्यता

देण्याची व दि.११.०१.२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये वितरित केलेले रुपये १,००,००,०००/- इतका निधी खर्च करण्यास मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

राज्य सरोवर संवर्धन योजनेंतर्गत दि.०६.०२.२०२४ रोजी झालेल्या सुकाणू समितीने शिफारस केल्यानुसार यशवंत गंगासागर तलावाचे पर्यावरणीयदृष्ट्या संवर्धनासाठी सोबत जोडलेल्या "प्रपत्र अ" मध्ये नमूद केलेली कामे पूर्ण करण्यासाठी एकूण रुपये ४,२८,००,०००/- (रुपये चार कोटी अठ्ठावीस लक्ष फक्त) इतक्या रकमेस खालील अटी व सोबत जोडलेल्या "प्रपत्र ब "मधील अटी व शर्तींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. सदर मंजूर एकूण रकमेपैकी ९०% हिस्सा म्हणून राज्य शासन व १०% हिस्सा म्हणून ग्रामपंचायत निधी उपलब्ध करून देईल. सदर योजनेचा वित्तीय आकृतीबंध पुढीलप्रमाणे राहील.

| अ.क्र. | हिस्सा | मंजूर निधी | अक्षरी मंजूर निधी |
|---|---|---|---|
| १ | **९०% राज्य हिस्सा** | ३,८५,२०,०००/- | रुपये तीन कोटी पंच्याऐंशी लक्ष वीस हजार फक्त |
| २ | **१०% ग्रामपंचायत हिस्सा** | ४२,८०,०००/- | रुपये बेचाळीस लक्ष ऐंशी हजार फक्त |
| | **एकूण** | **४,२८,००,०००/-** | **रुपये चार कोटी अठ्ठावीस लक्ष फक्त** |

अ. एकूण मंजूर निधीपैकी ग्रामपंचायत हिस्सा हा राज्य शासनामार्फत वितरित केलेल्या हिश्श्याच्या १०% या प्रमाणे प्रथमतः बैंक खात्यात जमा करण्यात यावा.

२. राज्य सरोवर संवर्धन योजनेंतर्गत यशवंत गंगासागर तलावाचे पर्यावरणीयदृष्ट्या संवर्धन करण्यासाठी राज्य हिश्यापोटी देय एकूण रुपये ३,८५,२०,०००-/ (रुपये तीन कोटी पंच्याऐंशी लक्ष वीस हजार फक्त) पैकी संदर्भाधिन शासन निर्णय क्र.२ अन्वये वितरित करण्यात आलेला पहिला हप्ता रु. १,००,००,०००/- (रुपये एक कोटी फक्त( इतका निधी शासन निर्णयातील "प्रपत्र ब" मधील सर्व मार्गदर्शक तत्त्वे, अटी व शर्तींच्या अधीन राहून मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद कोल्हापूर, जि .कोल्हापूर यांना खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद कोल्हापूर, जि .कोल्हापूर यांच्याकडून पर्यावरण व वातावरणीय बदल विभागास कोणतेही येणे बाकी नाही.

४. प्रस्तूत शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२४/प्रक्र.३४/अर्थ-३, दिनांक १ एप्रिल, २०२४ व वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२४/प्रक्र.८०/अर्थ-३, दिनांक २५ जुलै, २०२४ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०८२८११२४२५२९०४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SURYAKANT KISAN NIKAM

Digitally signed by SURYAKANT KISAN NIKAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=ENVIRONMENT AND CLIMATE CHANGE DEPARTMENT, 2.5.4.20=3978ce8e745a91e0561f6f9473df7e92873ee7ac8c2f7c49ac520e61061dddеd, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=3A94A1F658A34D45CA2859DBC88DFB40760079B8946087EF0FB8BC7CD7314C27, cn=SURYAKANT KISAN NIKAM
Date: 2024.08.28 11:39:39 +05'30'

**(सु.कि.निकम ) ,**
**सह सचिव, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग**
**महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राज भवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री (पर्यावरण व वातावरणीय बदल ) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
४. प्रधान सचिव (पर्यावरण व वातावरणीय बदल), मंत्रालय, मुंबई
५. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
६. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
७. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद कोल्हापूर,जि .कोल्हापूर
८. महालेखापाल (लेखापरिक्षा) १. महाराष्ट्र मुंबई-४०००२०
९. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई- ४०००२०
१०. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर
११. महालेखापाल (लेखापरिक्षा) २. महाराष्ट्र, नागपूर
१२. अधिदान व लेखाधिकारी, वांद्रे (पूर्व) मुंबई-४०००५१.
१३. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
१४. निवासी लेखाधिकारी, मुंबई
१५. संचालक, लेखा व कोषागरे, मुंबई
१६. मुख्यलेखा परिक्षक, स्थानिक निधीलेखा, कोकण भवन, मुंबई
१७. वित्त विभाग (कार्यासन क्रमांक व्यय-१६/अर्थसंकल्प-७), मंत्रालय, मुंबई.
१८. नियोजन विभाग, कार्यासन क्र.१४७२, मंत्रालय, मंबई.
१९. रोखशाखा, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग, मंत्रालय, मुंबई.
२०. निवडनस्ती.

रासयो २०२४/प्र.क्र.३/आस्थापना अ, दि. २६ ऑगस्ट, २०२४ चे सहपत्र

**"प्रपत्र-अ"**

| Sr. No. | Name of the Work | Amount in Rs. |
|---|---|---|
| **A.** | **Core work** | |
| 1. | Desilting (Dry & Wet) | 48,66,995.45 |
| 2. | Cleaning & Removing Aquatic weed | 62,847.00 |
| 3. | Phyto ride technology | 37,94,870.00 |
| 4. | Silt Trap | 13,12,112.00 |
| 5. | Gabion wall and Earthen Bund | 96,27,913.00 |
| 6. | Retaining structure (earthen bank protection work) | 45,55,066.00 |
| 7. | Toilet and Washroom | 14,80,050.00 |
| 8. | Chain link Fencing | 15,22,633.00 |
| | **Subtotal of Core Component** | **2,72,22,486.45** |
| **B.** | **Non-Core Work** | |
| 9. | Pathway | 25,13,420.00 |
| 10. | Benches, Trees & Dustbin | 27,15,992.00 |
| 11. | Water Network and Drip Irrigation | 22,13,900.00 |
| 12. | Solar Pump and Solar Light | 15,22,888.00 |
| 13. | Environmental & Awareness Programme | 82,500.00 |
| | **Subtotal of Non-Core Component** | **90,48,700.00** |
| | **Total (A+B)** | **3,62,71,186.45** |
| 14. | Add GST 18% | 65,28,813.56 |
| | **Gross Total** | **4,28,00,000.01** |
| | **Say** | **4,28,00,000.00** |

SURYAKANT KISAN NIKAM

Digitally signed by SURYAKANT KISAN NIKAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=ENVIRONMENT AND CLIMATE CHANGE DEPARTMENT, 2.5.4.20=3978ce8e745a91e0561f6f9473df7e92873ee7ac8c2f7c49ac520e61061ddded, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=3A94A1F658A34D45CA2859DBC88DFB40760079B8946087EF0FB8BC7CD7314C27, cn=SURYAKANT KISAN NIKAM
Date: 2024.08.28 11:39:23 +05'30'

(सु.कि.निकम)
सह सचिव, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग
महाराष्ट्र शासन

## रासयो २०२४/प्र.क्र.३/आस्थापना अ, दि. २६ ऑगस्ट, २०२४ चे सहपत्र

## "प्रपत्र-ब"

राज्य सरोवर संवर्धन योजनेंतर्गत मौजे गडमुडशिंगी, ता. करवीर, जि. कोल्हापूर येथील यशवंत गंगासागर तलावाच्या संवर्धन कामांसाठीच्या अटी व शर्ती-

१. प्रपत्र-अ मधील नमूद कामांना प्रथमत: तांत्रिक मंजूरी प्राप्त करुन घेण्यात यावी. योजनेच्या प्रत्येक टप्प्यात हाती घेण्यात येणा-या कामाचे मंजूर तांत्रिक आराखडे, अंदाजपत्रके, नकाशे, संकल्पचित्रे इ. शासनाकडे काम सुरू करण्यापूर्वी सादर करणे बंधनकारक असेल. शासनास उपरोक्त माहिती सादर केल्यानंतरच कामे सुरू करण्यात यावीत. हाती घेण्यात यावयाच्या ("प्रपत्र-अ" मधील नमूद कामे) कामासंबंधित तलावाच्या सद्यस्थितीची छायाचित्रे घेण्यात यावी, तसेच व्हीडीओ रेकॉडिंग करण्यात यावे. कामांच्या प्रगतीनुसार दर दोन महिन्यांनी याप्रकारे छायाचित्रण करण्यात यावे.

२. तलाव संवर्धन क्षेत्रात तज्ञ व कामाचा अनुभव असलेली तसेच "प्रपत्र-अ" नुसार मंजूर खर्चाच्या बाबी संबधित तज्ञ व पुरेसे तांत्रिक मनुष्यबळ असलेली संस्था /शासकीय प्राधिकरण/ मंडळ यांची प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार संस्था म्हणून मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद कोल्हापूर,जि .कोल्हापूर यांनी विहित पध्दतीने नियुक्ती करावी. ही संस्था "प्रपत्र-अ" नुसार मंजूर खर्चाच्या बाबींचे स्थानिक डी. एस. आर. प्रमाणे खर्चाचे अंदाज, कामाचे आराखडे तयार करणे व तपासणे, कामाची गुणवत्ता राखणे, सर्व कामे विहित कालमर्यादेत पूर्ण करणे याबाबत वेळोवेळी समन्वय करेल. जिल्हा परिषदेने प्रकल्पासाठी तांत्रिक मनुष्यबळ तयार होण्यासाठी या संस्थेचा उपयोग करावा.

३. शासनाने वितरित केलेल्या निधीच्या विहित प्रमाणात मौजे गडमुडशिंगी ग्रामपंचायत  यांनी त्यांचा अनुज्ञेय हिस्सा खात्यात जमा करावा. सदर हिस्सा प्रकल्पावर खर्च केल्याशिवाय पुढील हप्ता मुक्त करण्यात येणार नाही.

४. कामे विहित कालावधीत पूर्ण करण्याची व कामाची गुणवत्ता राखण्याची संपूर्ण जबाबदारी ही मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद कोल्हापूर, जि .कोल्हापूर यांची असेल. सदर प्रकल्पाच्या कामासाठी लागणारा निधी खर्च करतांना मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद कोल्हापूर, जि . कोल्हापूर यांच्या देखरेखेखाली करण्यात यावा.

५. प्रकल्पाची यथायोग्य अंमलबजावणी होण्याच्या दृष्टीकोनातून प्रकल्प अंमलबजावणी समिती मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद कोल्हापूर, जि .कोल्हापूर  यांच्या अध्यक्षतेखाली स्थापना करण्यात यावी. या समितीत जिल्हा परिषदेतील संबंधित अधिकारी, कर्मचारी, पर्यावरण विषयक तज्ञ, उपरोक्त प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार संस्थेचे प्रतिनिधी यांच्यासह जिल्हा परिषदेस आवश्यक वाटतील अशा प्रतिनिधींचा समावेश करण्यात यावा. ही समिती प्रकल्पांतर्गत होत असलेल्या सर्व कामकाजाचे सनियंत्रण करेल व कामांच्या गुणवत्तेवर नियंत्रण ठेवेल. सदर समितीची आढावा बैठक दर महिन्याला अयोजित करण्यात यावी.

६. प्रकल्प पूर्ण झाल्यावरही प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार संस्थेच्या मदतीशिवाय तलावाचे संवर्धन होणे गरजेचे असल्याने योजनेची कामे पूर्ण झाल्यावरही ही समिती बैठका आयोजित करेल. ही समिती भौतिक बाबींची देखभाल, प्रकल्पांपासून मिळणारे उत्पन्न, प्रकल्प संवर्धनासाठी उपाययोजना व खर्च याबाबत आढावा घेत राहील.

७. काम पूर्ण झाल्यावर किमान पुढील १० वर्षांपर्यंत तलावाची देखभाल व दुरुस्ती जिल्हा परिषदेने स्वखर्चाने करावयाची आहे. तसेच जिल्हा परिषद प्रकल्प अंमलबजावणी समितीचा अहवाल प्रत्येक ६ महिन्यांनी शासनाकडे पाठविण्याची व्यवस्था करेल.

८. तलावाच्या पाण्याची गुणवत्ता चालू महिन्यापासून पुढे प्रत्येक महिन्याला तपासण्यात यावी. पाण्याची गुणवत्ता तपासण्यासाठी या क्षेत्रातील प्रयोगशाळेची /संस्थेची/ मंडळाची नियुक्ती करण्यात यावी. दर महिन्याचा पाण्याच्या गुणवत्तेचा अहवाल सदर संस्था प्रकल्प सनियंत्रण समितीस व पर्यावरण व वातावरणीय बदल विभागास दर तीन महिन्यांनी सादर करेल.

९. उपरोक्त मुद्यानुसार केलेल्या कार्यवाही प्रमाणे मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद कोल्हापूर, जिल्हा कोल्हापूर हे शासनास दर तीन महिन्याला खालील अहवाल सादर करतील.

अ. मजूर कामांचा भौतिक प्रगती अहवाल.

ब. पाण्याच्या गुणवत्ता अहवालाच्या प्रती.

क. प्रकल्प सनियंत्रण समितीच्या बैठकीचे इतिवृत.

ड. खर्चाचे प्रत्येक तिमाहीचे उपयोगिता प्रमाणपत्र.

१०. सदर अहवाल सादर केल्याशिवाय कामाच्या पुढील टप्यातील निधी उपलब्ध करून देण्यात येणार नाही. तसेच आर्थिक वर्षाचे उपयोगिता प्रमाणपत्र वर्ष संपल्यानंतर एप्रिलच्या १० तारखेपर्यंत पर्यावरण व वातावरणीय बदल विभागास सादर करावे. उपरोक्त मंजूर योजनेसाठी निधी उपलब्धतेनुसार अनुदान मुक्त करण्यात येईल.

११. योजनेंतर्गत मंजूर विशिष्ट कामासाठी अदा केलेली वा मान्य केलेली रक्कम त्याच कामासाठी राज्य शासनाने घालून दिलेल्या अटी व शर्ती प्रमाणे व विहित कालमर्यादेत मान्य केलेल्या खर्चाच्या मर्यादेत खर्च करणे आवश्यक आहे. हा निधी इतर दुस-या कोणत्याही कामासाठी वा जिल्हा परिषदेच्या कामासाठी वापरता येणार नाही किंवा वळता करता येणार नाही. विशिष्ट कामासाठी मान्य केलेल्या खर्चापेक्षा जास्त खर्च झाल्यास त्याची जबाबदारी संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी व जिल्हा परिषदेची असेल.

१२. या योजनेंतर्गत प्राप्त होणारा निधी हा राष्ट्रीयीकृत बँकेत स्वतंत्र खाते उघडून त्या अंतर्गत जमा करावा व बँकेत ठेवलेल्या निधीवर मिळणारे व्याज याच निधीत जमा करावे. या निधीच्या उपयोगितेवर नियंत्रण राहण्यासाठी खात्याचे संचालन मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद कोल्हापूर

यांच्याव्दारे करण्यात यावे. उपयोगिता प्रमाणपत्र सादर करतेवेळी बँकेतील या खात्यावर झालेल्या व्यवहाराच्या नोंदी दर्शविणा-या पासबुकाची साक्षांकित प्रत सोबत जोडण्यात यावी.

१३. योजना पूर्ण झाल्यावर या योजनेतर्गत निर्माण झालेल्या मालमत्तेपासून किया सोयीसुविधांपासून मिळणारे उत्पन्न हे या योजनेसाठी उघडलेल्या स्वतंत्र बैंक खात्यात जमा करण्यात यावे. या उत्पन्नातून तलाव संवर्धनासाठी अतिरिक्त कामे राज्य शासनाच्या पर्यावरण व वातावरणीय बदल विभागाच्या अनुमतीने हाती घेता येतील. मात्र तलावाच्या संवर्धनाच्या कामाव्यतिरिक्त इतर कोणत्याही कामासाठी हा महसूली निधी वापरता येणार नाही.

१४. ही कामे शासन आदेशाच्या दिनांकापासून / धनादेशाच्या दिनांकापासून २४ महिन्यात किंवा तत्पूर्वी पूर्ण करावयाची आहेत.

१५. मंजूर बाबीतील खर्चामध्ये बचत झाल्यास बचत झालेला निधी योजनेतीलच दुस-या उपांगासाठी राज्य शासनाच्या पर्यावरण व वातावरणीय बदल विभागाच्या परवानगीने वापरता येईल.

१६. राज्य सरोवर संवर्धन योजनेंतर्गत निर्माण केलेल्या यंत्रणेच्या देखभाल व दुरुस्तीचा खर्च योजना कार्यान्वित झाल्यानंतर संबंधित जिल्हा परिषदेने स्वतःच्या निधीतून भागवावयाचा आहे.

१७. योजनेतर्गत खर्च करण्यात येणा-या रकमेचे लेखे प्रचलित लेखा संहितेनुसारच ठेवण्यात यावेत व त्याचे लेखापरिक्षण स्थानिक निधी व लेखापाल यांच्याव्दारे करण्यात यावे व त्याचा अहवाल पर्यावरण व वातावरणीय बदल विभागास पाठविण्यात यावा. तसेच प्रत्येक आर्थिक वर्षाअखेर झालेल्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र संबंधित महालेखापाल कार्यालयास पाठविण्याची जबाबदारी कोल्हापूर जिल्हा परिषदेची राहील.

१८. तलावांच्या कामांच्या प्रगतीच्या अहवालाची तसेच खर्चाच्या विवरणपत्राची पर्यावरण व वातावरणीय बदल विभागाच्या सक्षम अधिका-याकडून तपासणी करण्यात येईल व तपासणीच्या वेळी जिल्हा परिषदेने आवश्यक ती सर्व कागदपत्रे उपलब्ध करून देणे बंधनकारक असेल.

१९. संबंधित जिल्हा परिषदेच्या हद्दीतील हॉटेलमधून/ लोकवस्तीतून / वाणिज्यिक आस्थापनेतून निघणारे सांडपाणी तलावात जाणार नाही याची जबाबदारी संबंधित स्थानिक संस्थेची असेल.

२०. योजनेवरील कामासाठी मान्यता प्राप्त झालेल्या रक्कमेपेक्षा अधिक खर्च झालेली रक्कम शासनाकडून उपलब्ध होणार नाही. या कामासाठी शासनाने अदा केलेली रक्कम जर त्या कामावर घालून दिलेल्या विविक्षित वेळेमध्ये खर्च होऊ शकत नसेल तर त्यास राज्य शासनाच्या पर्यावरण व वातावरणीय बदल विभागाची पूर्वपरवानगी घेणे आवश्यक असेल.

२१. योजनेवरील कामासाठी अदा केलेली रक्कम योग्यरितीने वापरली जात नाही किंवा कामाची योग्य ती प्रगती होत नाही असे शासनाच्या निदर्शनास आल्यास शासन कोणत्याही क्षणी अशा कामांची प्रशासकीय मान्यता रद्दबातल करु शकेल.

२२. राज्य शासनाच्या पर्यावरण व वातावरणीय बदल विभागाच्या परवानगी शिवाय तलावात बोटींगची सुविधा उपलब्ध करून देण्यात येणार नाही. तसेच यांत्रिक बोटींचा वापर तलावात कुठल्याही प्रयोजनासाठी अनुज्ञेय असणार नाही. फक्त पॅडल बोटचा वापर अनुज्ञेय असेल.

२३. तलावात मत्स्यमारी शक्यतो करण्यात येऊ नये, मत्स्यमारी करावयाची झाल्यास फक्त मार्च, एप्रिल व मे या तीन महिन्यासाठी परवानगी देण्यात यावी. अशावेळी १० इंच व त्यापेक्षा लहान आकाराच्या माशांना पकडण्याची मुभा देण्यात येऊ नये. स्थानिक परिस्थितीनुसार याबाबत प्रकल्प संनियंत्रण समिती वेळोवेळी निर्णय घेईल.

२४. योजनेवरील कामासाठी राज्य शासनाच्या अनुदाना व्यतिरिक्त शासनाकडून, वित्तीय संस्थांकडून वा आणखी कोणत्याही संस्थांकडून प्राप्त निधी या योजने अंतर्गत खर्च झाल्याचे दर्शविण्यात येऊ नये. (No Overlapping of schemes)

२५. योजनेचे समन्वयन व पर्यवेक्षण करण्यासाठी भेट देणा-या राज्य शासनाच्या अधिका-यांस आवश्यक त्या सर्व प्रशासकीय सुविधा उपलब्ध करून देणे आवश्यक असेल.

२६. योजनेंतर्गत शासनाच्या अनुदानातून तयार केलेली मालमता, ज्या कामासाठी निर्माण केली आहे, त्याच कामासाठी वापरणे आवश्यक आहे व त्यासाठी ही मालमत्ता अभिलेखित करणे आवश्यक आहे.

२७. योजनेंतर्गत करण्यात येणा-या निरनिराळ्या कामांचे व समन्वयाचे काम राज्यस्तरावरील सनियंत्रण समितीव्दारे करण्यात येते. या समितीने कामाबाबत वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे काटेकोरपणे पालन करणे आवश्यक असेल.

२८. योजनेंतर्गत जिल्हा परिषदेच्या आस्थापनेवरील व लागणा-या मनुष्यबळावरील खर्च संबंधित स्थानिक स्वराज्य संस्थेव्दारे करण्यात येईल. त्यासाठी या विभागाकडून अनुदान देण्यात येणार नाही.

२९. योजनेंतर्गत तलावातून काढण्यात येणा-या गाळांचे अभिलेख व छायाचित्रांसह पुरावे जिल्हा परिषदेने जतन करावेत. तसेच गाळाच्या विल्हेवाटीची अभिलेखामध्ये नोंद करून ठेवावी.

३०. तलाव संवर्धनाबाबत मंजूर कामांमध्ये तलावातील गाळ काढणे व सिल्ट ट्रैप लावण्याच्या कामाचा समावेश असल्यास, तलावाच्या गाळ काढण्याच्या कामाबरोबरच तसेच पावसाळ्यापूर्वी सिल्ट ट्रैप लावण्याचे काम पूर्ण होणे आवश्यक आहे. अन्यथा तलावात पुन्हा गाळ जमा होऊ शकतो.

३१. उपरोक्त मंजूर कामांसह तलावाभोवती वनीकरण(Tree plantation/ Afforestation) करण्यात यावे. वनीकरण करतांना स्थानिक झाडांच्या लागवडीसह शासनाचे विविध अभियान/ उपक्रम यांची उद्दिष्ट्ये साध्य होतील-जसे Bomboo Mission, Miyawaki Plantation अशा पद्धतीने वनीकरण करण्यास प्राधान्य देण्यात यावे. तसेच जमिनीची धूप रोखण्यासाठी आणि काही प्रमाणात नैसर्गिकरित्या जलशुद्धीकरणासाठी वाळा (Vetiver), कर्दळी (Canna), शेवगा (Moringa) इ. स्वरूपाच्या वनस्पतींची लागवडीचा समावेश करण्यात यावा.

३२.तलावाच्या कामास सुरूवात करण्यापूर्वीची छायाचित्रे विभागास सादर करावीत.

३३.राज्य शासनाने वेळोवेळी घालून दिलेल्या अटींचे व शर्तीचे पालन करणे जिल्हा परिषदेस बंधनकारक राहील.

३४. योजनेंतर्गत किती लोकांना रोजगार उपलब्ध झाला याची नोंद ठेवावी.

३५. योजना कालमर्यादेत पूर्ण करणे बंधनकारक असल्याने योजने करिता कोणतेही एस्कलेशन चार्जेस अनुज्ञेय नाहीत.

३६. योजनेंतर्गत मंजूर कामांच्या निविदा ह्या शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या विहित प्रक्रियेचा अवलंब करून स्विकाराव्यात. तसेच प्रकल्पांतर्गत मंजूर किंमतीपेक्षा जास्त किमतीच्या निविदा स्विकारण्यात येऊ नयेत.

३७. कॉन्ट्रेक्टरने विहित वेळेत काम पूर्ण न केल्यास त्यांच्यावर दंड आकारण्याची तरतूद ठेवण्यात यावी.

३८. योजनांतर्गत झालेल्या सर्व खर्चाचा ताळमेळ वेळोवेळी अधिदान व लेखा अधिकारी कार्यालय, मुंबई व तसेच महालेखाकार कार्यालय, मुंबई/नागपूर यांच्या कार्यालयाशी घालण्याची जबाबदारी संबंधित स्थानिक स्वराज्य संस्थेची असेल.

३९. योजना पूर्ण झाल्यावर भविष्यात तलावाच्या उपयोगाबाबत व वापराबाबत किंवा तलावासंदर्भात कोणतीही नवीन कामे हाती घ्यावयाची झाल्यास त्यास प्रथम राज्य शासनाच्या पर्यावरण व वातावरणीय बदल विभागाची मान्यता घेण्यात यावी.

४०. तलावाच्या क्षेत्राबाबत, मालकीबाबत, राबविण्यात येणा-या कामाच्या गुणवत्तेबाबत तसेच Surface floating wetland beds बाबत वा इतर संबंधित बाबींबाबत भविष्यात काही न्यायालयीन वा अन्य बाबी उद्भवल्यास संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी तसेच संबंधित जिल्हा परिषद सर्वस्वी जबाबदार राहील.

SURYAKANT KISAN NIKAM

Digitally signed by SURYAKANT KISAN NIKAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=ENVIRONMENT AND CLIMATE CHANGE DEPARTMENT, 2.5.4.20=3978ce8e745a91e0561f6f9473df7e92873ee7ac8c2f7c49ac520e61061ddded, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=3A94A1F658A34D45CA2859DBC88DFB40760079B8946087EF0FB8BC7CD7314C27, cn=SURYAKANT KISAN NIKAM
Date: 2024.08.28 11:39:03 +05'30'

**(सु.कि.निकम) ,**
**सह सचिव, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग**
**महाराष्ट्र शासन**